**सन २०१९-२० प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये (PIP) वचनबद्ध ठेवलेल्या (Committed) अनुदानातून आयपीएचएस कार्यक्रमांतर्गत जैव वैद्यकीय कचरा व्यवस्थापनासाठी लागणाऱ्या साधन सामुग्री खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.०९/आरोग्य -७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २३ जुलै, २०२०.

वाचा :-

१. सहसंचालक(रुग्णालये)यांचे पत्र क्र.राआसो/आयपीएचएस/११२७०४- ७०७/ २०२०, दिनांक ०२ मार्च, २०२०.
२. शासन पत्र,समक्रमांक दिनांक २९ मे, २०२० .
३. आयुक्त,आरोग्यसेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्यअभियान, मुंबई यांची मान्य टिपणी दिनांक ०८ जुलै, २०२०.
४. सहसंचालक(रुग्णालये) यांचे पत्र क्र. राआसो/आयपीएचएस/२३४७७-४८९/ २०२०, दिनांक १० जुलै, २०२०.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० च्या प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) मध्ये वचनबद्ध ठेवलेल्या (Committed) अनुदानातून आयपीएचएस कार्यक्रमांतर्गत जैव वैद्यकीय कचरा व्यवस्थापनासाठी लागणाऱ्या साधन सामुग्री खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता देण्याचा विषय शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात Free Pathological Services FMR Code ६.४.१ अंतर्गत वचनबद्ध (Committed) असलेल्या रु.४६५२.०५ लक्ष एवढ्या निधीतून, FMR Code ६.४.५,Bio Medical Waste Management साठी रु.५५३.७० लक्ष एवढा निधी वर्ग करुन वचनबद्ध ठेवण्याचा प्रस्ताव IPHS सेल यांनी दिनांक ०४.०७.२०२० अन्वये संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान यांना सादर केला आहे.सदर उपलब्ध अनुदानातून आयपीएचएस कार्यक्रमांतर्गत जैव वैद्यकीय कचरा व्यवस्थापनासाठी लागणाऱ्या साधन सामुग्री खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रियेस प्रशासकीय

मान्यता देण्यात येत आहे.याबाबत अनुदान व खरेदी करावयाच्या बाबींचा तपशील पुढील प्रमाणे आहे.:-

## अ - अनुदानाचा तपशील
## Committed unspent balance २०१९-२०

| FMR | Name of Programme | Particulars | Total committed |
|---|---|---|---|
| ६.४.५ | IPHS | Any other (Please specify) Biological Waste Management | Rs.५५३.७० Lakh. |

## ब- प्रस्तावित खरेदीचा तपशील

| Sr.No. | Category of Items | Volume in Liters | Quantity | Price (Rs) | Total Approx.Budget (In Rs) |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Yellow Bins | 30 | 9465 | 500 | 4732500 |
| 2 | Red Bins | 30 | 8872 | 500 | 4436000 |
| 3 | Blue Bins | 30 | 2218 | 500 | 1109000 |
| 4 | Black Bins | 30 | 1716 | 500 | 858000 |
| 5 | Sharps Container | 5 | 4436 | 150 | 665400 |
| 6 | Yellow bags | **To be fitted into respective color bins of specified size.** | 3447060 | 1.05 | 3619413 |
| 7 | Red Bags | | 3238280 | 1.05 | 3400194 |
| 8 | Blue Bags | | 809570 | 1.05 | 850048 |
| 9 | Black Bags | | 626340 | 1.05 | 657657 |
| 10 | Wheel Barrow Steel | 50 | 1103 | 8000 | 8824000 |
| | | 100 | 106 | 11000 | 1166000 |
| | | | | **Total** | **9990000** |

०२. सदर प्रशासकीय मान्यता ही पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.:-

१. सदर बाबींच्या खरेदीची आवश्यकता /मागणी याची शहनिशा/खातरजमा करण्यात यावी. तदनंतरच सदर बाबींची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२. सदरहू बाबींचे विनिदेश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू बाबींचे तांत्रिक विनिदेश ( Technical Specifications) संबंधित तज्ञांनी ( तांत्रिक समिती /अधिकारी )यांनी मान्य केलेल्या विनिदेशानुसारच असावेत.तसेच,सदर तांत्रिक विनिदेश (Technical Specifications) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रीतीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात (PIP) मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विनिदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यक्रम प्रमुखांची राहील.प्रस्तावात समाविष्ट बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

३. शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग - ३/उद्योग-४,दिनांक ०१.१२.२०१६ अन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारित नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

४. प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत,त्यामुळे GEM Portal,इतर राज्यांचे दर करार यांच्याकडील उपलब्ध असलेले न्यूनतम दर विचारात घेण्यात यावेत.तसेच हाफकिन संस्थे कडून सदर बाबींची खरेदी झाली असल्यास अथवा होत असल्यास संबंधित निविदेत प्राप्त झालेले न्यूनतम दर विचारात घेऊन त्या दरांना अंदाजित दर म्हणून गृहीत धरण्यात यावे व त्या नुसार निविदेकारिता मागणी नोंदविताना औषधे,औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रीयेअंती दर निश्चित करण्यात यावा.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबबत आणि संबधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे ,त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५. सदर बाबींबाबत पुरवठापूर्व/पुरवठाउत्तर नमुना याछुद्रिक तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करून ते प्रमाणित विनिदेशानुसार असल्याची खात्री करून घ्यावी.

६. सदरहू बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०१९-२० च्या मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यातील FMR Code ६.४.१ Free Pathological Services मधील रु. ४६५२.०५ लक्ष ह्या तरतुदीतून FMR Code ६.४.५ Biomedical Waste Management या लेखाशीर्षाखाली रु.५५३.७० लक्ष वळते करून वचनबद्ध (Committed) करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. **तथापि, सदर खरेदी प्रक्रिया करण्यापूर्वी सहसंचालक रुग्णालये यांनी या प्रस्तावास मान्यता प्राप्त झाल्याबाबत संचालक (वित्त व लेखा) यांचेकडून खातरजमा करून घेणे आवश्यक राहील**. सदरची निविदा प्रक्रिया प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यवी.

७. तसेच सन २०२०-२१ च्या प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये FMR Code ६.४.५. अंतर्गत राज्यातील रुग्णालये व प्राथमिक आरोग्य केंद्रांना जैववैद्यकीय कचरा व्यवस्थापन, Common Biomedical Waste Treatment and Disposal Facility (CBWTF/ CTDF) यासाठी रु.१७७२.०५ लक्ष एवढे अनुदान जिल्हास्तरावर वितरीत करण्यात आले आहे. तरी, सदर अनुदानातून करण्यात येणारी खरेदी व आता प्रस्तावित असलेली खरेदी यामध्ये द्विरुक्ती (Duplication) होणार नाही याची कार्यक्रम प्रमुखांनी दक्षता घ्यावी.

८. संपूर्ण निविदा प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४,नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१०.निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यावर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

११.शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथील अटींची पूर्तता व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त आरोग्यसेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई व सम्बन्धित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

४. शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय,दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग पहिला,उपविभाग-२ मधील अ.क्र.४,नियम क्र.७ अन्वये अवजारे,किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजुरी देण्यासाठी प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२३१३०६१००११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.07.23 13:26:51 +05'30'

**(मिलींद कुळकर्णी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक,मुंबई,
२. संचालक,आरोग्यसेवा,मुंबई,
३. संचालक (वित्त व लेखा),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई,
४. अतिरिक्त संचालक,राज्य कुटुंब कल्याण कार्यालय,पुणे,
५. सर्व सहसंचालक ( आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत )
६. उपसंचालक,सर्व मंडळ कार्यालये,
७. सर्व सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)

८. जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९.निवड नस्ती (कार्यासन-आरोग्य-७).